२००९०८१८१३५२२६००१

**सामाजिक वनीकरण विभागांतर्गत असलेल्या पदांचा आकृतीबंध निश्चित करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

ग्राम विकास व जलसंधारण विभाग
शासन निर्णय क्रमांक : आस्था-२००९/प्र.क्र.१८३/जल-१३
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १८ ऑगष्ट, २००९.

**वाचा** :-

शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र. आस्था-२००६/प्रक्र.१५९(१)/जल-१३, दिनांक २९/१२/२००७.

**शुध्दीपत्रक** :-

वित्त विभागाच्या दिनांक १०/९/०१ च्या शासन निर्णयामधील मार्गदर्शक सूचनांनुसार सामाजिक वनीकरण संचालनालयांतर्गत मंजूर पदांचा क्षेत्रिय स्तरावर वेळोवेळी आढावा घेऊन प्रस्तावित आकृतीबंधास संयुक्त सचिव समितीने दिनांक ३०/१२/०३ रोजी संपन्न झालेल्या बैठकीमध्ये तत्वत: मान्यता दिली होती.

तद्नंतर दिनांक २८/९/२००७ रोजी संपन्न झालेल्या उच्च स्तरीय सचिव समितीच्या बैठकीमध्ये सामाजिक वनीकरणाच्या आस्थापनेवरील मंजूर असलेल्या अस्थायी व अधिसंख्य पदांएवढा आकृतीबंध तसेच **नवनिर्मित नंदुरबार, हिंगोली, गोंदिया व वाशिम** या चार जिल्ह्याकरिता प्रत्येकी एक या प्रमाणे उप संचालक, मुख्य लेखापाल, लघुटंकलेखक व शिपाई अशी १६ पदे अंतिम करण्याच्या प्रस्तावास मान्यता दिली होती.

त्यांनुसार निर्गमित करण्यात आलेल्या क्र. आस्था-२००६/प्रक्र.१५९(१)/जल-१३, दिनांक २९/१२/२००७ च्या शासन निर्णयात उपरोक्त नवनिर्मित चार जिल्ह्यातील १६ पदांचा समावेश करण्यात आला नव्हता. तरी आता सामाजिक वनीकरण विभागांतर्गत असलेल्या पदांच्या आकृतीबंधाच्या उपरोक्त दिनांक २९/१२/२००७ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णयात, सदरहू नवनिर्मित नंदूरबार, हिंगोली, गोंदिया व वाशिम या चार जिल्ह्यांकरिता प्रत्येकी एक या प्रमाणे उप संचालक, मुख्य लेखापाल, लघुटंकलेखक व शिपाई अशी १६ नवीन पदे निर्माण करण्यास शासनाची मंजूरी आहे असे वाचण्यात यावे. तसेच उच्च स्तरीय सचिव समितीने या

विभागाच्या अधिपत्याखालील सामाजिक वनीकरण विभागासाठी एकूण २४८१ पदांऐवजी २४९७ अशी पदे मंजूर केली आहेत असे वाचण्यात यावे.

तसेच,दिनांक २९/१२/२००७ च्या शासन निर्णयातील परिच्छेद १ मधील अनुक्रमांक IV मध्ये "नंदूरबार, हिंगोली, गोंदिया व नाशिक या" या ऐवजी "नंदूरबार, हिंगोली, गोंदिया व वाशिम या नवनिर्मित" असेही वाचण्यात यावे.

उपरोक्त १६ नवीन पदे भरण्याबाबतची कार्यवाही वन विभागाकडून करण्यात येईल. त्यांच्या वेतनाचा खर्च मागणी क्र. एल-३, २४०६ वनीकरण व वन्यजीवन (२४०६ १६३७) या लेखाशिर्षाखालील तरतूदीतून भागविण्यात यावा.

हे शुध्दीपत्रक वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र ४१४/२००९/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ८/७/२००९ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

( मो. को. भोये )
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
मा. राज्यपालांचे सचिव,
मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
मा. उपमुख्य मंत्र्यांचे सचिव,
मा.मंत्री/मा.राज्य मंत्री (जलसंधारण) यांचे खाजगी सचिव,
मा. मुख्य सचिव, यांचे स्वीय सहाय्यक,
अप्पर मुख्य सचिव (वने) यांचे स्वीय सहायक
प्रधान सचिव, (प्र.सु.व र.व का.) सामान्य प्रशासन विभाग यांचे स्वीय सहायक
प्रधान सचिव (जलसंधारण) यांचे स्वीय सहायक,
प्रधान सचिव (व्यय) वित्त विभाग, यांचे स्वीय सहायक
संचालक, सामाजिक वनीकरण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
सर्व सहसंचालक, सामाजिक वनीकरण वृत्त,
सर्व उपसंचालक, सामाजिक वनीकरण विभाग,
महालेखापाल, (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर,
सर्व कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
वित्त विभाग, कार्यासन क्र.व्यय-१५, अर्थसंकल्प-१९ व वित्तीय सुधारणा-१,मंत्रालय, मुंबई-३२
ग्राम विकास व जलसंधारण विभाग, कार्यासन क्र.जल-११, जल-१२, व कार्यासन-वित्त-१,(ग्रा.वि.)
निवडनस्ती/ग्राम विकास व जलसंधारण विभाग/जल-१३.

D:\SBK\sbk\GRAst cr 183.09 G R of New District .lwp